**प.पू. श्रीदत्तमहाराज कवीश्वर, पीठाधीश्वर श्रीवासुदेवनिवास, पुणे**
**यांचा मंगल आशीर्वाद -**

नमः श्रीदत्तगुरवे हृद्वासोधौतिकारवे ।
स्वात्मज्योतिः प्रकाशाय सुखायानर्थशान्तये ।।१।।
(सप्तशतीगुरुचरित्रसार)

श्रीवासुदेवनिवास प्रकाशानातर्फे प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज यांचा 'माघमाहात्म्य 'ग्रंथ स्वतंत्रपणे प्रकाशित होत आहे याचे संस्थेला समाधान होत आहे.

श्री स्वामीमहाराजांच्या वाङमयातील तृतीय पुष्पामध्ये हा ग्रंथ समाविष्ट केलेला आहे. त्या तृतीय खंडातील प्रास्ताविकामध्ये या ग्रंथमाहात्म्याची माहिती आलेली आहे. आज या ग्रंथाचे स्वतंत्रपणे प्रकाशन करुन भक्तांची सोय होत आहे. तसेच या महत्त्वपूर्ण ग्रंथाकडे लक्ष्य आकर्षित होऊन श्रीस्वामी महाराजांचे अलैकिक धर्मप्रसारकार्याचे प्रभावी दर्शन व प्रेरक मार्गदर्शनही होणार आहे.

या ग्रंथाला नागपूर विद्यापीठातील अधिकारी संस्कृतज्ञ आणि श्रीस्वामीमहाराजांच्या ग्रंथांचे मननशील अभ्यासू-श्रीस्वामीच्यावर प्रगाढ श्रध्दा असलेले डॉ. श्री. नानासाहेब तथा गुणाकारजी वा. पिंपळापुरे यांची विस्तृत प्रस्तावना लाभली आहे. या प्रस्तावनेवरून ग्रंथ माहात्म्य समजून तर येईलच परंतु त्याचबरोबर श्रीस्वामीमहाराजांचे अलौकिकत्त्व दृष्टीपुढे उभे राहून आपल्या श्रध्दा-भक्ती गुणांचे पोषण होईल. डॉ. श्री. नानासाहेब पिंपळापुरे यांनी प्रकृतीचे सहाय्य नसताना, विविध लेखनाची व्यग्रता असूनही, अल्पावधीत अभ्यासपूर्वक प्रस्तावना दिली ती श्रीस्वामींच्यावरील अनन्य श्रध्देमुळे. ही प्रकाशन संस्था त्यांची कृतज्ञ आहे. आम्हीही श्रीदत्तप्रभूंच्या चरणी प्रार्थना करीत आहोत की, त्यांना उत्तम आयुरारोग्य लाभून श्रीस्वामी महाराजांच्या वाङमयाची त्यांचेकडून उत्तरोत्तर उत्तम सेवा व्हावी.

तसेच या ग्रंथाची छपाई सांगलीचे गुरूभक्त श्री. कुलकर्णी बंधूनी आपल्या "एस. बी. प्रिंटींग प्रेस " मध्ये श्रध्देने स्वीकारून पूर्ण केले आहे. हा सर्व परिवारच श्रीसद्‌गुरू वामनरावजी गुळवणी महाराजांचा अनुग्रहीत आहे. या सर्वानीच तत्परतेने केलेल्या या कार्याबद्दल संस्था कृतज्ञ आहे. तसेच गुरूभक्त श्री. कमलाकर दत्तात्रेय तथा आबा देशपांडे पुणे यांची 'माघ माहात्म्य' हा मैलिक ग्रंथ स्वतंत्र प्राप्त व्हावा अशी तळमळ ही श्री स्वामी महाराजांची प्रेरणा असल्याने हे कार्य पूर्ण होऊ शकले आहे. या सर्व निमित्ताला साह्यभूत झालेल्या सर्वही ज्ञात अज्ञात गुरुभक्ताबद्दल कृतज्ञता व्यक्त करुन सर्वही भक्तांचे श्रीकृपेने मंगल व्हावे अशी श्रीचरणी प्रार्थना आहे.

श्रीगुरुकृपांकित

**दत्तात्रेय धुंडिराज कवीश्वर**

श्रीवासुदेवनिवास पुणे ४
मार्गशीष १५ शके १९१४
श्रीदत्तजयंती

### श्रीस्वामीमहाराजरचित ग्रंथमालेच्यातृतीया पुष्पातील
### प्रकाशकांचे निवेदन
### मूळ प्रस्तावनेतील संबध्द उध्दरण

'माघमाहात्म्य' ग्रंथ हि श्रीदत्त व सहस्त्रार्जुन यांचा संवादरूप लहानसाच आहे. श्रीदत्तात्रेयांच्या दर्शनास एकदा अर्जुन गेला असता श्रीदत्त मोठ्या पहाटे उठून माघस्नान करीत असलेले पाहून अर्जुनाने देहरक्षणाची आवश्यकता वर्णन केली व अशा थंडीच्या वेळीं माघस्नान करणे बरोबर नाही असें सांगितले. त्यावेळी त्याला श्रीदत्तप्रभूनी शास्त्रविहित कर्माचें महत्त्व युवतीनें पटवून दिले आहे. ज्ञानानेंच मोक्ष मिळतो हें खरें पण तें ज्ञान पापी माणसाला उत्पन्न होत नाही म्हणून त्या पापांचा नाश व्हावा व झालेलें ज्ञान चांगलें ठसावे याकरितांच शास्त्रानें कर्मादि साधने सांगितली आहेत. त्यांतही यज्ञयागादि कर्मे सर्वांना करतां येणे अशक्य, म्हणून तीर्थस्नानासारखीं विशिष्ट कर्मे कोणालाही केव्हांही करतां येण्यासारखीं शास्त्राने सांगितली आहेत. प्रपंचाकरितां देहाला कितीही कष्ट पडले तरी माणसाला कांही वाटत नाही. मग शास्त्राधार घेऊन पुण्यकर्म करीत असतां काही कष्ट झाले म्हणून काय हरकत आहे? यामुळे ईश्वराचा क्षोभ तरी होणार नाही; इत्यादि शास्त्ररहस्य श्रीमहाराजांची आपल्या अधिकारी वाणीनें सडेतोडपणानें व्यक्त केलें आहे. याबद्दल त्यांच्या मननीय व संदेह दूर करणाऱ्या कांहीं ओव्या पुढीलप्रमाणे आहेत. 'टाळावया विषयाशा। वेद योजी युक्ती अशा । सध्दर्मे क्षाळुनी दुरावा । क्रमे पाशा तोडवितो ।।१।। यज्ञादिक धीशुध्दयर्थ । योजीले ते यथार्थ । न घडती त्याला हा स्वार्थ । दावी समर्थ वेदराज ।।२।। मनुष्ये स्वदेहपीडन । व्यर्थ न कींजे साच जाण । शास्त्राधारें करितां कोण । अकारण वदेल तें ।।३।। ज्ञानेंच मोक्ष होतो खास । परंतु तें न पापियास । लाभे म्हणोनि पापऱ्हास । शास्त्र खास करवी असे ।।४।। न होता पापक्षालन । न लाभे ज्ञानसाधन । साधनाविना न ठसे ज्ञान । म्हणोन योजी शास्त्र हें ।।५।। प्रकृति प्राक्तन चेष्टा करवी । ह्या सध्दर्मे तिला बरवी । कळवितां मोक्षपदवी । अचूक पाविजे न कष्टें ।।६।। दारपुत्रादिकांकरितां । देहा कष्टविती त्या परता । शास्त्रधारें पुण्य करिता । ईशक्षोभता न घडे ।।७।।' आशा अनेक ओव्या दाखविता येतील. जसें जसे. श्रीमहाराजांच्या ग्रंथांचे परिशीलन श्रध्देने व तीव्र जिज्ञासेने केलें जाईल तसें तसें 'घृष्ट घृष्टं पुनश्चन्दनं चारुगन्धं' या उक्तीप्रमाणें अधिकारी जनांना, शास्त्रविहित मार्गाचें निश्चित ज्ञान होऊन ते सहज कृतार्थ होतील यांत मुळींच संशय नाही.

'माघमहात्म्य' या ग्रंथांत प्रत्येक ओवीचे आद्याक्षर वाचीत गेल्यास श्रीदत्तमालामंत्र तयार होतो. या मंत्राचा पाठही या ग्रंथाचे पठणाबरोबर साहजिकच साधकांना घडतो. मंत्रशास्त्रांतील नियमाप्रमाणें सर्वानाच सर्व मंत्रांचा अधिकार संभवनीय नाहीं. त्रिपादगायत्रीमंत्राचाच अधिकार द्विजांना आहे. पण त्या गृहस्थांना चतुर्थपादाचा अधिकार नाही. केंवल प्रणवजपाचा अधिकार संन्याशांना आहे तर तो तसा गृहस्थांना नाही. त्यांना तो इतर मंत्राचा जोडूनच जपावा. पण आपणांकडून कांही साधन घडावे व ते साक्षात् श्रुतिमंत्रपठनादि रूपाने व्हावें अशी आज पुष्कळ धर्मश्रध्दालु लोकांचीही मनःप्रवृत्ति दिसून येते. त्यांचीही मनींषा पूर्ण होऊन त्यांना त्या कर्माचें शास्त्रोक्त फलही मिळावें या सदिच्छेने श्रीमहाराजांचे कडून अशा मंत्रगर्भ स्त्रोत्रांची, ग्रंथांची रचना झाली असावी. एखादा जितरस पुरुष नुसते एरंडेल तेलही मधाप्रमाणे चाटून खाऊ शकतो. पण त्यात तेलाचा एखाद्याला वासही सहन होत नाही. मग त्याला तें एरंडेल दुसऱ्याला कशात तरी

मिसळून घ्यावे लागतें. याप्रमाणे येथे तर श्रीमहाराजांच्या ग्रंथात-प्रतिपाद्य, परमात्मा किंवा त्याच्या प्राप्तीचें शास्त्रोक्त साधन, प्रतिपादन करणारी श्रीमहाराजांची दिव्यवाणी, ती अशी कीं जिचें वर्णन 'सत्यवादाचें तप । माझ्या वाचे केलें कोटी कल्प' या श्रीज्ञानराजांच्या शब्दांतच करता येईल. आणि त्या वाणींतही साक्षात् परमात्मप्रतीक असणारे महामंत्र ग्रथित केले गेलेले असा खरोखर त्रिवेणी संगमच झालेला असल्याने, ही भावना ठेवून श्रीमहाराजांच्या ग्रंथाचे परिशीलन करणाऱ्या साधकांना 'याचि देही याचि डोळा' अशी इष्टफलाची सिध्दि होणार नाही काय? खात्री होईलच होईल.

स्त्रीशिक्षा व प्राकृत मनन हे दोन संवादात्मक ग्रंथ या खंडात माघमाहात्म्यानंतर दिलेले आहेत. हे ग्रंथा वेदान्तशास्त्रांतील प्रमेये सुलभ रीतीने समजण्यास अत्यंत उपयोगी पडणारे आहेत. थोडक्यात, मराठी भाषेमध्ये या ग्रंथातून श्रीमहाराजांनी वेदान्ताचें सर्व सार आणलें आहे. श्रीमहाराजांचे बरेच ग्रंथ संस्कृत भाषेतच लिहिलेले आहेत. तथापि सामान्य जनांकरिता मराठी भाषेतही त्यांचे ग्रंथ आहेत. मराठी भाषेंत ग्रंथ करण्याचें कारण श्रीमहाराजांनी एके ठिकाणी सांगितले. - - 'त्रेधा पापतापहर ! त्याणे केला जो सादर । कार्तवीर्या बोध रुचिर ।भाषांतर करू त्याचे ।।१।। या भाषेची प्रैढी आज । लोकां असे प्रायः मज ।धीप्रेरकें दिधला उमज । निजगुज समजावया ।।२।।' (मा. मा.) याप्रमाणे लोकांची अपेक्षा व योग्यता ओळखून ज्ञानी पुरुषांचा व्यवहार होत असतो हो सिध्द झालें.

| | |
|---|---|
| श्रीदत्तजयंती | श्रीगुरुभक्त |
| १८७४ | वामन दत्तात्रेय गुळवणी |
| सोमवार | नारायण पेठ २०, पुणे २ |

।। स वासुदेवसरस्वतियतिर्भगवान् मेऽस्ति परावरा गतिः।।

# माघ माहात्म्याचे सुबोध सारग्रहण

प.प. श्रीवासुदेवनंदसरस्वती टेंबे स्वामी यांची ही लहानगी रचना - माघमाहात्म्य. सुमारे शंभर वर्षापूर्वीची (इ. स. १९००) ही साहित्य कृति. चातुर्मासपूर्वीचे ते दिवस. मृगाला आरंभ झाला. मृग धावू लागले की यतीचा चातुर्मासविसावा सुरु व्हायचा. नित्य भ्रमंतीच्या जीवनात लेखनाचा स्वर लागण्याचेहि हेच दिवस असायचे. श्री स्वामींच्या शब्दात आसन ठेवण्याचा हा काळ असे. मग "सांगणे" होई व त्याप्रमाणे 'लिहिणे' होई. श्रीस्वामींच्या प्रायः सा-या रचना या अशा क्रमाने झाल्या आहेत. माघमाहात्म्याच्या पुष्पिकेत श्रीस्वामी म्हणतात-

श्री गोविन्दकृपापूर्णा वासुदेवसरस्वती
मृगार्के नर्मदातीरे तीर्थराज इवोग्दता ।

(अर्थ - श्री गोविन्दाच्या कृपेने पूर्ण असणारी वासुदेवाची वाणी मृगनक्षत्र समयी नर्मदा तटी प्रयागाप्रमाणे प्रगट झाली.) हे श्रीगोविंद कोण ?नेहमीचे श्रीदत्त, श्रीगुरु असे हे नाव दिसत नाही. श्रीगोविंद भगवत्पाद हे श्रीमच्छंकराचार्याचे दीक्षागुरु. नर्मदा किनारीच ही दीक्षा झाली होती. श्रीदत्तांनी त्याच रुपात तर श्रीस्वामींना दर्शन व प्रेरणा दिली नसेल ?शक्य आहे. "कोण तुझ्या भावा जाणे दत्ता" असे श्रीस्वामीमहाराज एके ठिकाणी म्हणतात. अशा विषयात मग आपल्या सारख्यांना निर्णायकपणे काय बोलता येणार? तेच ते जाणोत ! परंतु श्रीस्वामींच्या जीवनावर व वाङमयावर आचार्य श्रीशंकरांची पडलेली सावली पाहता व नर्मदातीराचा संदर्भ लक्षात घेता हे असंभवनीय वाटत नाही. वाडीचे प. पू. श्रीगोविंदयति श्रीस्वामींच्या गुरुस्थानीच होते हा त्यांचाही निर्देश आहे. ते मंडलेश्वर चिखलदा भागात त्यासमयी नर्मदाकिनारी गेले होते. इतर पुष्पिकेत तसा निर्देश येत नाही. ही पुष्पिका आणखीहि एका दृष्टीने मला सूचक दिसते. गंगा-यमुनेचा प्रयाग संगम त्रिवेणी-संगम म्हणून प्रसिध्द आहे. तिथे सरस्वती नदी गुप्त आहे. तीच आता वासुदेवानंदांचा "सरस्वती" रूपाने नर्मदातीरावर प्रगट झाली असे तर श्रीस्वामींना म्हणायचे नसेल? श्रीगोविंदकृपा, (वासुदेव) सरस्वती व नर्मदा असा हा नवा त्रिवेणी संगम आता निर्माण झाला. "स्यादस्थानोपगतयमुनासङ्मेचाभिरामा" असे मेघदूतात कविकुलगुरु-कालिदासाने म्हणटले आहे. याची इथे आठवण होते. तीर्थराजाची उपमा (तीर्थराजः हे प्रथमात पद घेतले तर) वासुदेवसरस्वतीकडे (म्हणजेच माघमाहात्म्याकडे) जशी वळविता येते तशीच ती (तीर्थराजे असे सप्तम्यन्त पद घेतले तर) नर्मदातीराकडे सुध्दा वळविता येते. दोन्ही संभावना आहेत. माघमाहात्म्याला तीर्थराज म्हणण्यात औचित्य निश्चित आहे. कारण प्रयागसंगामातील माघस्नान आजहि तेवढे प्रसिध्द आहे. त्याचा महिमा माघमाहात्म्यात गायिला आहेच. त्यामुळे "माघमाहात्म्याला" तीर्थराजाची उपमा निश्चित शोभते. पण दुसरी संभावना तरळत राहिली तर तिला नको म्हणण्याचेहि कारण नाही. संस्कृत भाषेची हीच श्रीमन्ती ! तिचा "सारस्वत" आविष्कार श्रीस्वामींच्या या पुष्पिकेत आढळतो.

हा श्रीदत्तार्जुन संवाद आहे. माघमाहात्म्य हे नाव श्रींस्वामीनी दिले ते त्यात आलेल्या माघस्नानाच्या माहात्म्यवर्णनावरून. परंतु अंगागिभावाचा विचार केला कर माघमाहात्म्य हे अंग व संवाद अंगी असेच म्हणावे लागेल. आरंभाला श्रीस्वामी म्हणतात -

त्रेघा पापतापहर । त्याणे केला जो सादर ।

कार्तवीर्या बोध रुचिर । भाषांतर करू त्याचे ।।१०।।

ग्रंथाच्या शेवटी ओवी येते ती ही.

हा श्रीदत्तार्जुन-संवाद । माघमाहात्म्यमिषे विशद ।
हो हा हरी जीवात्म-भेद । अखेर पद दे ध्रुव ।।३४३।।

या उपक्रमोसंहारावरून माघमाहात्म्य हे निमित्त आहे. त्यानिमित्ताने विशद करायचा आहे तो दत्तार्जुन-संवाद. नामकरण करताना काही अधिक अवधाने ठेवावी लागतात. नाटकाला नायकाचे नाव देण्याचा सर्वसाधारण संकेत असलातरी शाकुंतला सारख्या नाटकाला नायिकेच्या नावाने अंकित करावेसे कवीला वाटेल. इथे श्रीदत्तार्जुन संवादाचा आरंभ-बिन्दु माघस्नान असल्याने तेच नाव श्रीस्वामींना द्यावेसे वाटले तर त्यात नवल वाटण्याचे कारण नाही. कार्तवीर्यार्जुन श्रीदत्ताच्या भेटीला आले. ते माघस्नानाचे दिवस होते. श्रीगुरुच्या (सह्यतटी माघी येवुन श्रीदत्तचरण वंदितसे ।१२) भेटीप्रमाणे संवादालाही कांही निमित्त असावे लागते. भारतीय युद्धात स्वजनांच्या विरुध्द उभे राहण्याचे श्रीकृष्णार्जुन-संवादाला निमित्त झाले. पण संवादाला आरंभ झाला म्हणजे विषयातून विषय निघत जातो व केवळ निमित्तालाच तेवढे चिकटून राहण्याचे कारण उरत नाही. चर्चेला सर्वंकषपणा येतो तो त्यामुळे श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या अठरा अध्यायांना वेगळी नावे आहेत. ती त्याचीच द्योतक होत. इथेंही  निमित्त मिळाले ते श्रीदत्तांच्या माघस्नानाचे. थंडीचे दिवस. त्यात पुनः थंड पाण्याने स्नान व तेही सकाळी. सर्वच आनंद !!अर्जुनाला प्रश्न करावासा वाटला तो त्यामुळे.

"मानुषदेह दुर्लभ । त्याचा झाला ज्याला लाभ।
ते त्या देती जरी क्षोभ । ईशक्षोभ तया हो की ।।१६।।
त्रस्त पूर्वी जो शीताने । पुनः त्याला माघस्नाने ।
अत्यंत शीतजलाने । नित्य यत्ने कष्टविती ।।१७।।
संकल्प तरी त्या स्वर्गाचा । काय उपयोगी नश्वराचा ।
संदेह हा मच्चित्ताचा । वारा साचा शिष्य मी ।।१८।।"

श्रीअर्जुन कांही अंशी सामान्य माणसांच्या वतीने बोलायचे ठरवून बोलत होते. त्यांनी माघस्नान केले नसेल असे थोडेच आहे? श्रीदत्त सुध्दा साधकाची भूमिका घेऊन उत्तर देत आहेत. दोघेही स्वतःची भूमिका बाजूला ठेंवून संवादसुख देत आहेत हे या श्रीदत्तार्जुन-संवादाचे एक वेगळे आगळे वैशिष्ट्य. श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील अर्जुनाच्या प्रश्नाची जरा अपूर्व असल्याने त्यातील प्रत्ययकारिता विशेष जाणवते हे खरे आहे. पण हे सारे प्रश्न देहबुध्दीतून. हे सूत्र समान असल्याने असल्या प्रश्नोत्तरातून विचारांचे समान अंश आपोआप हाती येत जातात. निमित्त अर्थात मागे पडत जाते. हे अनुसंधान ठेवून माहात्म्य आपल्याला वाचायचे आहे.

अर्जुनाच्या प्रश्नात निखळ देहबुध्दि भरली आहे असा त्याचा अर्थ नव्हे. तशी ती असेल तर प्रश्न विचारण्याचे कारण नसते. गीतेतील अर्जुन "मज हातीचा तू दूर होसी" या चिंतेने व्याकुळ झाला आहे; तर माघ माहात्म्यातील अर्जुन "ईश-क्षोभ तया हो की" या शंकेने अस्वस्थ आहे. देहबुध्दीच असेल तर असे प्रश्न उपस्थित होत नाहीत. अर्जुनाच्या प्रश्नात तीन अंश आहेत. १) ईश-क्षोभ  २) दुर्लभ देहाचे दंडन   ३) नश्वर फलाची प्राप्ति. हे सर्वच घटक मार्मिक आहेत.

उत्तर देताना श्रीदत्त सर्वच घटकांचा शास्त्रीय विचार करीत आहेत. ईश-क्षोभ कसा

ओळखयचा? देह-क्षोभ म्हणजे देव-क्षोभ हे समीकरण बरोबर होईल काय ?देव-क्षोभाच्या नावाखाली आपली अतिरिक्त देहबुध्दि लपविण्याचीच भूमिका पुष्कळदा असू शकते. आपली वंचकता आपल्या लक्षात येत नाही. देव-क्षोभ कसा ओळखायचा? देवाचा शब्द आपण मोडला तर देव क्षोभेल असे म्हणता येईल. वेद हे देवाचे शब्द आहेत. तो शब्द मोडला तर देवाचा क्षोभ होईल हे खरे.

विधाता जो जीवांचा । वेद ही त्याची वाचा ।
ती उल्लंघी तयाचा । कोण कैचा कैवारी (मा. ९८)

वेद जर देवाचे शब्द आहेत तर त्यांचे पालन करीत असता देव-क्षोभ होणारच कसा? "शास्त्रयोनित्वात् "या ब्रह्म सूत्रावर भाष्य करताना महतः ऋग्वेदादेः शास्त्रस्य सकल "विद्यास्थानोपबृंहितस्य" असे श्रीशंकराचार्यानी म्हटले आहे. या विद्यास्थानात षडंगे, मीमांसा-न्याय-पुराणे-धर्मशास्त्रे या सर्वाचा समावेश होतो. वेदांचा परिवार केवढा मोठा आहे हे त्यावरून लक्षात येते. या परिवारात राहूनहि देव-क्षोभ होईल हे कसे शक्य आहे? हे मात्र खरे की हा शास्त्राधार न घेता स्वदेहाला पीडा देणारा देवाच्या क्षोभाला पात्र होईल. व्यर्थ देहाचे चोज पुरविणारा देखिल देवाचा क्षोभ घेईल. कारण, तोही आज्ञा-भंजकच आहे. म्हणून श्रीस्वामी म्हणतात -

यत्प्राप्ति अतिदुर्लभ । ह्याणेच घडे मुक्तिलाभ ।
व्यर्थ याचा न कीजे लोभ । देव-क्षोभ अन्यथा ।।३०।।
मनुष्य स्वदेह-पीडन । व्यर्थ न कीजे साच जाण ।
शास्त्राधारे करिता कोण । अकारण वदेल ते ।।३१।।

देहाची व्यर्थ लालन किंवा व्यर्थ दंडन ही दोन्ही अत्यंतिक टोके झाले. शास्त्राधारे वर्तन हा सुवर्णमध्य अशा वर्तनाला दंडनशब्द लावताना देखिल मग संकोच वाटू लागले ते दंडन नव्हे ते वळण होय आणि ते लावून घेण्याची आवश्यकता असते. कारण देह दुर्लभ आहे हे जसे एक वास्तव आहे तसे तो वासनेचे, माहेर, ममताहंतेचे घर, नरकव्दार, दुर्धर दुष्पूर वचंक (२७) अशुचि, अनित्य (२४) काम-मोह-स्थान (२३) आहे हे देखिल दुसरे प्रखर वास्तवच आहे. त्याकडे लक्ष देऊन वळण लावणे आवश्यकच आहे. एकीकडे देह दुर्लभ आहे म्हणून त्याला गोंजारायचे व दुसरीकडे एकाद्या उदात्त उद्दिष्टासाठीही त्याला राबवावयाचे नाही ही त्या दुर्लभता संकल्पेची विडंबना होय. माघ स्नानासारखी साधने वळण लावण्यासाठी असतात 'हे काय तुच्छ साधन !' अशी त्याविषयी बुध्दि ठेवू नये (२०७) अधिकारानुसार वेगवेगळी साधने शास्त्रांनी सांगितली असतात. ती तेवढीच प्रभावी असतात व प्रत्येक साधनाचे वेगळे वैशिष्ट्यहि असू शकते. माघस्नान यज्ञादि-साधनासारखे सामग्रीवर अवलंबून नाही. देहाची सामग्री त्याला पुरे. ते स्वतंत्र साधन आहे. (३७) अशा साधनानुष्ठानाच्या वेळीच आपण देहदंडनाचा व ईश-क्षोभाचा प्रश्न उपस्थित करतो. संसारासाठी खस्ता खाताना मात्र देहदंडनाचा व ईश-क्षोभाचा विचार मनात येऊ नये हे आश्चर्य आहे (३६) माघ-शब्दच माघस्नानाचे महत्व दर्शवितो. माघ शब्दात दोन पदे आहेत. मा आणि अद्य. अद्य म्हणजे पाप आणि मा म्हणजे नकार. अर्थात माघ हा अद्य-नाश करणारा आहे हे ओघानेच आले. (३२) असे श्रीस्वामीमहाराज सुचवीत आहेत.

नश्वर फलाचा काय हा अर्जुनाचा प्रश्न मात्र फार महत्वाचा. अशा साधकांचे अनुष्ठान

नश्वर फलासाठी करावे कोणीहि म्हणणार नाही, परंतु "सिध्दस्य गतिः चिन्तनीया" अशी शास्त्रांची व मार्गदर्शकांची भूमिका असते. नश्वर फलांची आकांक्षा माणसांचीच असते. त्यांनाहि वाट दाखविणे हे शास्त्रांचेच काम आहे म्हणून श्रीमहाराज म्हणतात -

टाळावया विषयाशा । वेद योजी युक्ती अशा ।
सद्धर्मे क्षाळुनी दुराशा । क्रमे पाशा तोडवितो ।।२०।।

मुळात शास्त्रांचा उद्देश माणसाने नश्वर फलांची हाव धरावी असा कधी असू शकत नाही. एखादी उत्कट किंवा प्रगट कामना नसली तरी मन पूर्णपणे कामनाविरहित, शुध्द म्हणजे निर्विषय असते असेहि नाही. चित्त शुध्द कसे होईल? शास्त्रांनी दाखविलेल्या विविध साधनांच्या अनुष्ठानाने ते क्रमाने शुध्द होत जाते. आपल्या न कळत त्याचे इष्ट परिणाम घडत जातात. एका बाजूने कामना-पूर्ति व दुसऱ्या बाजूने चित्त-शोधन होत जाते. धीर धरण्याची मात्र गरज आहे. माघ-माहात्म्यात आलेल्या कथांचा हा महत्वाचा संदेश आहे व तो सर्व ग्रंथभर खेळत आहे.

माघमाहात्म्यात प्रमुख तीन आख्यानांचा संग्रह आहे. त्याला त्रिवेणीसंगम म्हणायचे असल्यास म्हणता येईल. तिलोत्तमा अप्सरा (पूर्वीची ऋचीका विधरा ब्राह्मणी) श्रीकुंडल-विकुंडल बंधु व कांचन-मालिनी अप्सरा-उमेची सखी (पूर्वजन्मीची वेश्या) अशा तिघांच्या-चौघांच्या कथा इथे गुंफल्या आहेत. (कांचनमालिनीच्या कथेतच इंद्र-अहल्या आख्यान येते) ही सारी नावे आकर्षक वाटावी इतकी सुंदर आहेत. प्रत्येक पात्राच्या व्यक्तित्वाचा वेगळा घाट आहे. वेगळी जीवन-कहाणी आहे. एखादा कुशल साहित्यिक पाहू शकेल तर त्याच्या जीवनात नाटय आहे. श्रीदत्तार्जुन-संवादाचा मुख्य-स्थायिभाव बोध. तो "रूचिर" व्हावा एवढयाच मर्यादेपर्यंत आख्यानांचा प्रवाह इथे खेळविला व वाढविला पण संवेदनशील मनाला ते नाटय जाणवू शकेल. ऋचीका एक बालविधवा सच्छील सदाचरणी. माघ स्नानाचा नेम धरून विष्णु-लोकात तिलोत्तम नामक अप्सरा पद मिळवून पुढे ब्रह्मानंदाने अद्यापि नांदते. हा तिचा जीवनाचा आलेख. (३८ ते ५४) कपिला-रेवा-संगमावरील साठ माघस्नानांची ही फलश्रुती. उत्तरोत्तर प्रगती दर्शविणारी ही व्यक्ति रेषा.

श्रीकुंडल-विकुंडल यांचे जीवन इतके सरळ नाहीं एका सच्छील कोट्याधीश हेमकुंडल वैश्याची ही मुले बाप स्वर्ग-वासी होताच कुमित्रसंगतीने बिघडतात. व्यसनाधीन होतात. भिकेला लागतात. शेवटी डाकूच्या संगतीला लागून श्रीकुंडल वाघाचे भक्ष्य बनतो तर विकुंडल सर्प दंशाने मरतो. पण एवढयाहि काळयाकुट्ट जीवनात एक जमेची बाजू असते. दोन माघ स्नानाचे पुण्य जोडीला असल्याने वैकुठवास विकुंडलाला घडतो व त्याच्याच पुण्य-समर्पणाने नरकात पडलेल्या मोठया बंधूला-श्रीकुंडलाला-सद्गति मिळते. (५६ ते २०९) श्रीकुंडलाच्याहि पदरी काही सत्संगतीचा अंशतः कां होईना, ठेवा असतो तोच त्याला हात देतो. बरेच चढ-उतार पाहिलेल्या ह्या व्यक्तिरेखा आहेत. यमुनेच्या स्नानाची ही फलश्रृति.

कांचनमालिनी पूर्वीची वेश्या. अत्यंत उन्मत. मद्य-मासांत लोळण घेणारी. कलिंग राजाला सौंदर्यमदाने भुलवून अनेक राजांगनांचे शिव्या-शाप ओढवून घेणारी. अनेकांना असेच भुलवून आपल्या जीवनाचे पूर्ण मातेरे करून म्हातारपणी पश्चात्तापाने दग्ध होते. सुदैवाने एक विप्र तिला मार्ग-दर्शक मिळतो. माघ-स्नानाचे साधन तिला लाभते. कैलासात पार्वतीचे सखीपद लाभण्यापर्यंत तिची पात्रता वाढते. तरीही प्रयाग-स्नानाचा नियम ती सोडत नाही. याच कैलासोत्तर जीवनात

एका ब्रह्मराक्षसाचा ती उध्दार करू शकते. स्वत:चा उध्दार करून इतरांचा देखिल उध्दार करण्याइतपत पदवी गाठणारी ही सर्वात यशस्वी व्यक्तिरेखा म्हटली पाहिजे. याच आख्यानात गौतम-अहल्या-आख्यान येऊन जाते. (२१० ते २४१) प्रयाग-स्नानाची ही फलश्रृति या आख्यानाकडे डोळसपणे पाहता आले पाहिजे. कशा करिता येतात हि आख्याने ?ब्रृहदारण्यकोपनिषदातील दृछ-बालाकि कथेवर भाष्य करताना श्रीशंकराचार्यांनी जो प्रयोजन-विचार करून ठेवला तो इथे मार्गदर्शक होऊ शकेल ?
(बृ. आ. २.१.१. )

१) ऐतिह्य २) आचार-विधी ३) केवळ तर्क-वादाची निरर्थक ४) सुगम-बोध ही ती चार प्रयोजने होत. केव्हाना केव्हा हे प्रसंग (आख्यायिकेतील) घडले असतात. युगानुयुगीच्या या आठवणी आहेत. अनंत-काळाची ज्यांना कल्पना करता येत नाही त्यांच्यासाठी या कथा नाहीत. आपल्या किंवा आपल्यासारख्यांच्या टीच-भर सामर्थ्याचाच निकष ज्यांनी पुढे ठेवला त्यांच्यासाठी देखिल या कथा नाहीत. दर कोसावर बोली बदलते असा वाक्प्रचार रूढ आहे. विज्ञानाच्या साहाय्याने आज दर दहावर्षाने मनुष्य-सामर्थ्यात अंतर पडत असल्याचे आढळते. "दृष्टाच्च अदृष्टोपपत्ति" या न्यायाने विचार केला तर व्यक्तिगणिक, समाजागणिक, देशागणिक, शतकागणिक, सहस्त्रगणिक सामर्थ्यात अंतर पडणे स्वाभाविक आहे ते कधी उत्क्रांतीच्या दिशेने तर कधी अपक्रांतीच्या दिशेने पडू शकेल. या संदर्भात श्रीशंकराचार्यांचे वचन अतिशय उदबोधक आहे.

तस्माद्यथैकस्य सामर्थ्य दृष्टं तथा सर्वेषामेव भवितुमर्हतीति नास्त्येकान्त इत्यभिप्राय: l २-१.२५ शा. भा. (यावरून एखाद्याचे ज्या त-हेने सामर्थ्य पाहायला मिळते तसे सर्वांचेच असले पाहिजे हा निरपवाद नियम असू शकत नाही हा एकूण भाव ) अनुवाद.

ही शास्त्रशुध्द भूमिका घेऊन अपण विचार केला तर उपनिषदे, पुराणे किंवा माघ-माहात्म्यासारखे प्रस्तुत ग्रंथ यातील कथा आपल्याला श्रध्देयच वाटू लागतील. युगायुगीचे हे प्रसंग पूर्वजांनी कथांच्या रूपाने जतन करून ठेवले या बद्दल त्यांचे आभार देखिल मग मानावेसे वाटतील. तया या कथा जाग आणणा-या असतात. मनुष्याच्या संभाव्य-सामर्थ्याचा प्रत्यय आणून देणा-या या कथा असतात. तशी शास्त्र-शुध्द भूमिका नसेल तर मात्र गुंगीच येण्याचा संभव अधिक. या कथातून आपला आचारविधि कळतो. त्यामुळे सांस्कृतिक-परंपरा जतन करण्यासाठी काय केले पाहिजे याची दिशा कळते. केवळ तर्कासाठी असणारे व्यायाम-ग्रंथ वेगळे आहेत. परमार्थ-रहस्य जाणून घेण्याचे ते साधन नव्हे हा कथा-माध्यामाचा एक भाव असतो असे आचार्य म्हणतात. हे विशेषच लक्षात ठेवण्याजोगे आहे. आचार्यांसारखे लोक तर्कात कच्चे होते असे त्यांचे जाणते विरोधक म्हणणार नाहीत. तर्काला त्यांना अंतरावर ठेवावेसे वाटते आणि कथामाध्यमाची ती शिकवण आहे असे त्यांना सांगावेसे वाटते याकडे गंभीरपणे लक्ष देण्याची गरज आहे. कथामाध्यम हे वेल्हाळपणासाठी नसून जाणीवपूर्वक तर्कबुध्दीला तिची मर्यादा दाखविण्यासाठी हाताळण्यात येत असते हा आचार्यांचा अभिप्राय मला फार अर्थगर्भ वाटतो. प्रवाहाच्या विरूध्द जाण्याला जे धैर्य लागते, तसेच धैर्य अशा विधानासाठी लागत असते. आध्यात्मिक अनुभूती संपन्न पुरूषाला ते धैर्य धरण्यासाठी परिश्रमाची गरज नसते. म्हणूनच ते असली विधाने लीलेने करू शकतात. विषयाला सुगमता आणण्यासाठी कथा आख्यायिकांचा उपयोग होतो हे तर कोणालाहि

कळू शकते. या भूमिकेतून माघमाहात्म्यातील आख्यानाकडे बघायचे आहे.

आख्यान हे साधन न तत्त्वविवेचन हे साध्य असल्यामुळे माघ-माहात्म्यातील त्या प्रमुख भागाकडे अधिक लक्ष जावे अशीच येथिल योजना आहे. त्यामुळे कधी मंगलाचरणात, कधी कथेच्या ओघात, कधी कथेचा ओघ जरा थांबवून, कधी उपाख्यानात तर कधी कथेतील पात्रांच्या निवेदनात अथवा आत्मनिवेदनात हे परमार्थ निरूपण येते. अभ्यासकांना तेवढे सुध्दा वेचता येऊ शकेल. कथा-शरीराचा किंचितच स्पर्श झाला तर होईल नाहीतर नाही. पहिले मंगलाचरण (१-११) विकुंडलाख्यानातील विष्णुदूताचा उपदेश (७५ ते १६७) विकुंडलाख्यानाच्या समारोपाच्या शेवटी कथामुखाने नव्हे तर श्रीदत्तांनी स्वमुखाने केलेला अर्जुनोपदेश (१९० ते २०९) हे त्या प्रकारचे फार सुंदर उदाहरण आहे. मंगलाचरणात कथेचा ओघ थांबवून ठेवला आहे, तर श्रीदत्तोपदेशात विकुंडलाख्यान समाप्तीनंतर व कांचनमालिनी आख्यान सुरू होण्यासाठी लहानसे मध्यंतर लाभते आहे. अर्थात इथेहि जरा प्रवाह सारून ओंजळीने पाणी घेण्याची सोय आहे. माघमाहात्म्याच्या विस्ताराचा (३४० ओव्या) विचार केला तर हा मध्यभाग म्हणताहि येईल. इथे जरा विसावा घेता येईल. श्रीदत्ताने अर्जुनाशी इथे केलेले हितगुज जरा ऐकता येईल. कथा अगदी दूर निघून गेली पण तिला अंतरावर थांबवून आपणहि हा अर्जुनोपदेश ऐकत बसण्याचे हे ठिकाण आहे. ऐकण्याला फार वेळ लागणार नाही. कारण तसा तो अगदी थोडा आहे. पण "यत्सत्यं विरतेऽपि गीत-समये गच्छामि शृष्वन्तिव" (गाण्याची मैफिल संपली तरी अजून आपण ऐकतच आहो !! शुद्रक-मृच्छकटिक) असे त्याचे अनुरणन उरत राहील.

कांचनमालिनी आख्यान सुरू झाल्यानंतर कांचनमालिनी आत्म-कथनात, राक्षसाच्या आत्म-कथनात व कांचनमालिनीने केलेल्या उपदेशात परमार्थाचे-निरूपण निश्चित आहे. काशी महिमा, विश्वाची चिदन्वयता इत्यादि भाग त्यात येतो पण कथेचेहि सूर कानी येतच राहतात. ते जरा वर्दळीतील श्रवण आहे. ज्यांना वर्दळ व एकांतसारखा असतो त्यांचा प्रश्न नाही. पण इतरासाठी ते धावत श्रवण होय यातहि शंका नाही. या अशा दोन्ही कथा-संमिश्र व कथा असंमिश्र-परमसर्थनिरूपणातून अभ्यासकांना आपल्या अधिकारात काय येऊ शकते याचा शांतपणे विचार करून ते अतिंम उद्दिष्टांशी जोडता येईल. वैदिक-जीवनाचे एक समग्र चित्र इथे रेखाटण्याचा प्रयत्न केलेला आढळतो. त्यात बहिरंग या दोहोंचा समावेश आहे. निखळ बहिरंग व अंतरंग काहीच नसते हेही इथे लक्षात ठेवायचे आहे. जसे स्थूल-सूक्ष्म-शरीर एकामेकावाचून राहत नाहीत तसाच प्रकार

इथेहि असतो. प्रातःस्नान हे केवळ बहिरंग साधन आहे असे म्हणता येईल काय ? तिथेहि मनोबळ, देह-बुध्दीचा क्षणभर परित्याग, शास्त्र-निष्ठा इत्यादी आंतरिक गुणांचे पाठबळ अपेक्षितच असते, कधी ते नेणीवेने तर कधी ते जाणीवेने राहील ही गोष्ट वेगळी, अशा सर्व साधकांचा इथे आदर आहे.

प्रातःकाळी उठून स्नान करावे. स्नानावाचून कर्मावरण निष्फळ असते. आंघोळीवाचून राहणाऱ्या माणसाकडे पाहून देवही माघारी फिरतात. अशाचे प्रेत-जीवन होय. आंघोळीवाचून जो खाणे-पिणे करतो तो नरकात दुःख भोगतो. यमाचे भय त्याला चुकत नाही. (१२३ ते १२५)

यथाकाळी संध्यावंदन करावे (१०५), पंचमहायज्ञ करावा (१०५), आपल्या आवडीच्या पंचायतनातील देवीची पूजा करावी (९१), घरी तुळसी असावी. श्रीविष्णूला त्याची मंजरी वाहावी

(८५-८७) अगत्याने शिवार्चन करावे. त्रिपुंड् रूद्राक्ष धारण करावे. बिल्वपत्राने शिवपिंडीची पूजा करावी. रुद्राध्यायाचे पठन करावे. (८९) शालग्रामाचे पूजन करावे. दूध, दही इत्यादीसामग्रीने पूजा करावी, ते तीर्थ घ्यावे. (१४२ ते १५२) एकादशी करावी. निराहार किंवा फलाहार करून राहावे. दोन्ही एकादशींना हरिभजनात रंगावे. द्वादशीला पारणा करावी (१५२ ते १५७) आल्या गेल्या अतिथीला मध्याहन काळी अन्न द्यावे. इथ पात्रा-पात्र विचार मनात आणू नये (१२८ ते १३२) तीर्थयात्रा करावी. तीर्थ-वास करावा (१२७, १३०) गो-ब्राह्मणांची सेवा करावी. आंधळे, अपंग, गरीब यांना साह्य करावे. विहीरी पुष्करिणी, पाणपोई यांची उभारणी करावी. दानधर्म करावा. (८२) हिवाळयात गोरगरिबांना काष्ठ-कंबळे वाटावी व पावासाळयात त्याच्या विसाव्याची सोय करावी (१०१) वाटेवर झाडे लावावी. मुलापेक्षाहि ती तारक असतात. (८४) मंदिराचे रक्षण करावे, गोशाळा बांधाव्या, धर्मशाळा बांधाव्या, जीर्ण मठ-मंदिरांचा उध्दार करावा (९३/९४) राजाने शरणागताला अभय द्यावे. धर्मयुध्दात मृत्यु पतकरावा (८३)

खरे बोलावे. परधनाचा अपहार करू नये (१६०) परस्त्रीला आई मानावे (२११) परनिंदा ऐकू नये (१२२) सर्वजगत् भगवद्रूप मानून हिंसा करू नये (७८) दुसऱ्याला नाडू नये, त्याची कुचंबणा करू नये (१०९) दंभ-असूया सोडून द्यावी (११०) तितिक्षेचा अभ्यास करावा (१००) भूतावर दया ही भगवंताची पूजा होंय (९९) स्वधर्माचरण ही ईश्वराची पूजाच होय. स्वधर्मासारखे या जगात दुसरे तारक नाही. (९९) जंबूद्वीप व त्यातहि आर्यावर्त हा पुण्य देश आहे. इथे स्वधर्माचरण करून भव-सागराच्या पार व्हावे. (१०३/४) यज्ञ-यागादिकांचे अनुष्ठान किंवा स्वधर्माचरण इथेच उत्तमरीतीने घडते. इतर सर्व भोग-भूमि आहेत. (१०२)

वैदिक जीवनाचा हा एक आटोपसा आलेख आहे. वैयक्तिक कौटुंबिक-समाजिक-राष्ट्रीय आध्यामिक अशा सर्व अंगाचा इथे परामर्श आहे. आध्यात्मिक अंग हे प्रमुख. त्याच्याशी सर्वाचा संबंध जोडला जावा. हे लक्षात ठेवून जिथे तो संबंध प्रकर्षाने जोडला जाईल तिकडे अधिक लक्ष द्यावे हे ओघानेच आले. एकच उदाहरण इथे मार्गदर्शक होऊ शकेल.

यज्ञादिके पुनरावृत्ती । जन्मक्लेश न चुकती ।
शालग्रामार्चने मुक्ती । वैकुंठासी निश्चळ ।।१४३।।

यज्ञानुष्ठान व शालग्रामार्चन हे दोन्ही शास्त्रीय मार्गच होत यात शंका नाही. तथापि केवळ परलोक-सुख हेच अंतिम सुख मानायचे काय? अशा विचारात स्वाभाविकच मनाचा कल सगुणाराधनकडे वळावा असे श्रीस्वामींना सुचवावयाचे आहे. यज्ञादि अनुष्ठान ही सुध्दा ईश्वर-पूजा होय, यातही शंका नाही. पण तिथे फलाकांक्षेकडे व इंद्रवरुणादि देवतांकडे लक्ष अधिक. सगुणाराधनेमध्ये फलाकांक्षा नसेल असे नाही, तथापि प्रेमाला प्राधान्य मिळून ईश्वर-कृपेने अथवा ईश्वरा-भिन्न गुरुकृपेने फलवासना शमत जाते. त्यादृष्टीने पुढील ओव्या महत्त्वाच्या आहेत.

दावी गुरु शास्त्राधारे । ते श्रध्देने जो आदरे ।
तो नर भवाब्धी तरे । हेची खरे मुख्य वर्म ।।११४।।
यज्ञेष्ट पूर्तदान । जपतपानुष्ठान ।
सफळ होय भाविका जाण । गुरुवचन पाळिता ।।११५।।
क्लींकारादि बीजे योजून । मोहनादिप्रयोगाचरण ।
करविती कर्म दारूण । गुरु कोण म्हणेल ते ।।११६।।

जनदुःखे कळवळे । ज्याचे चित्त स्वये वळे ।
दीना तारी निजबळे । उपदेश फळे तयाचा ।।१०७।।
गरज नाही स्वार्थी ज्याला । सांगेना का सकामाला ।
त्याचा उपदेश भला । तो लोकांला तारीला ।।११८।।
त्रयिमूर्ति तो मानुन । पाळितर त्याचे वचन ।
उध्दरती हीन दीन । सत्य जाण त्रिवाचा ।।११४ ते ११९।।

सूक्ष्म विचार केला तर ह्या ओव्या म्हणजे श्रीस्वामींचे स्वजीवनावरील "स्वागत-भाष्य" होय असे म्हणायला हरकत नाही. विशेषतः शेवटच्या तीन ओव्या, त्यातहि, सांगेना का सकामाला, त्रयिमूर्ति तो मानून, सत्य जाण त्रिवाचा हे तीन चरण व त्यातहि सत्य त्रिवाचा ही 'त्रिपदी ' भाविकांनी लक्षात ठेवण्याजोगी आहे. पूर्ण निष्काम असलेले पुरूष आप्त-काम भगवंतच होत. त्याच्या मार्गदर्शनात साधकांना निष्काम करण्याचे सामर्थ्य असते. एक तर तो त्यांच्या संकल्प-शक्तीचा प्रभाव असतो व दुसरे त्यांच्यात अपूर्व विनियोगचातुर्य असते. त्याचाहि तो प्रभाव असतो. माघ-माहात्म्यात त्याची चुणुक दिसते. हे माघ-माहात्म्य श्रीदत्तात्रेय मालावर्णांकित करून ठेवले आहे. ॐनमो भगवते दत्तात्रेयाय "या पदरचनेने सुरू होणारा व ॐनमो महासिध्दाय स्वाहा" या पदरचनेने असा हा तीनशे त्रेचाळीस अक्षरांचा महा-मंत्र आहे. हा सिध्दमंत्र समजला जातो. त्याची हवनादिक अनुष्ठाने देखिल कामनासिध्यर्थ केली जातात. अर्थात त्याला काही अधिकार व साम्रगीची अपेक्षा असणारच. श्रीस्वामीनी श्रीदत्तमालावर्णातील प्रत्येक अक्षर जसे ॐ, न, मो-घेऊन त्याच अद्याक्षराने माघमाहात्म्यातील प्रत्येक ओवी रचली. स्वाभाविकच तीनशे त्रेचाळीस अक्षरांच्या तेवढयाच ओव्या झाल्या. हे एक वेगळया तऱ्हेचे "उपबृंहण" होय. "इतिहास पुराणाभ्यांवेदं समुपबृहयेत्" असा आपल्याकडे दंडक आहे. तिथे अर्थाचे उपबृंहण अभिप्रेत आहे. इथे मंत्रात्मकतेचे उपबृंहण आहे असे मानावे लागते. गंगाजलाचा थेंब दुसऱ्या पाण्यात टाकला तर सर्व पावित्र्य दुसऱ्या पाण्यात संक्रांत होते तसा हा प्रकार आहे. त्यामुळे मंत्रात्मकतेचा लाभ तर मिळाला पण त्यासोबत मूळ मंत्राच्या प्रखर अनुष्ठानाला लागणाऱ्या प्रखर अधिकाराचा प्रश्न सुटला व सर्वाचीच सोय झाली. मन्द-मध्यम व उत्तम अशा सर्वासाठीच हे मोकळे अंगण झाले. दत्तमालावर्णातील पदसंहतीचा जर विचार केला तर "जगत्रय-वशी-करणाय," सर्वमनः क्षोभणाय, महासंपत्प्रदाय, भूमण्डलाधित्यप्रदाय" इत्यादी श्रीदत्तविशेषणे किंवा "व्याधीन् विनाशय, दुःखं हर "इत्यादी उघड उघड कामनिकतेच्याच निदर्शक आहेत. त्या पदसंहतीचे वर्णतः विलगीकरण करून व वर्णाना ओव्यांकडे वळवून श्रीस्वामींनी त्या कामनिक अर्थाला "पारमार्थिक अर्थात" संक्रात करून टाकले आहे. मंत्र-संस्कार तोच कायम ठेवायचा व अर्थ-संस्कारात नावीन्य आणायचे हे देखिल वेगळया तऱ्हेचे उपबृंहणच होय. या साठी मंत्रदृष्टि व अर्थदृष्टि अशा तऱ्हेची द्विविध-प्रतिभा आवश्यक असते. मंत्रदृष्टिसाठी मुनि-सामर्थ्य तर अर्थदृष्टिसाठी कवि-सामर्थ्य अशा दोन-सामर्थ्याचा आविष्कार म्हणजे माघ-माहात्म्य. मालामंत्र इथे गुफंला आहे एवढयाच सीमित भूमिकेतून आपण बघू नये. तशी भूमिका घेतली तर दत्तमालावर्णाला ओवीरूप देताना जी कांही घास-पूस करावी लागली तीच आपले लक्ष वेधेल व मग माघमाहात्म्यातील सारा आशय आगन्तुक देखिल वाटू शकेल. केवळ शब्दचमत्कृति साधावी या हव्यासासाठी श्रीस्वामींनी या रचना निर्माण केल्या नाहीत. एवढया भव्य जीवनाचे असले प्रयोजन असू शकत नाही. दत्तमालावर्णातील

कामनिक आशय  देखिल मूलतः पारमार्थिक स्वरूपाचा असू शकतो हे त्यांना आर्तभक्तांचा सुध्दा हिरमोड न  करता दाखवून द्यायचे आहे. सरते शेवटी शब्दाचे अर्थ जे निश्चित होतात ते संकेताने, प्रतिभेने व अनुभवानेच ना ? श्रीचैतन्यहरप्रभु "यः कौमाहरः स एव वरः" हा काव्यप्रकाशातील व्यभिचारिणीच्या प्रेमाचा श्लोक मोठयामोठयाने आळवून नाचत असत. ते वैषयिक प्रेम कुणीकडे व शुध्द भगवत्प्रेम कुणीकडे?  पण हे कृपण विचार शब्दांच्या मर्यादित अर्थाकडे पाहणारेच लोक करीत असतात. दडलेली संपत्ति त्यांना दिसत नाही. ती दिसली तर तेहि अर्थाची अशीच मनस्वी उधळण करू शकतील. माघ-महात्म्यातील आशय हा त्या प्रकारचा आहे. ही दृष्टी ठेवली तर दत्तमालामंत्राचाच हा  नवा श्रीस्वामींना प्रतीत झालेला शुध्दतम अर्थ होय असे मनावे लागेल. पूर्वीचा शुध्द; हा शुध्दतम एवढेच काय ते. शुध्दतम शब्द वापरत असता प्रामुख्याने पुढे येतात त्या श्रीदत्तांनी अर्जुनाला उपदेशिलेल्या काही ओव्या -

उच्च नीच नसे देवा । तो पाहुनी भक्तिभावा ।
देतो आनंदाचा ठेवा । करी भवाब्धीपार ।।१९०।।
यत्ने व्रतस्थ राहती । जरी ते कामना धरिती ।
नित्य महात्म्ये ऐकती । पालटे मती आपोआप ।।१९६।।
ठस्का लागताही विवश । नाम घेताही तुटे पाश ।
मग स्वस्थ घेती निराश । त्यांच्या नाश होय की ।।१९७।।
स्तंभाधार जेवी घर । तेवी ज्ञान भक्त्याधार ।
परभक्ती ज्ञानोत्तर । जे ईश्वरानुरक्ति ।।२०२।।

या साऱ्याच ओव्या १८९ ते २०९ गुणगुणण्याजोग्या आहेत. पृष्ठ मर्यादेसाठी एवढयाच निवाडाव्या लागल्या. उपनिषदात काही ठिकाणी आख्यायिकेतून बाहेर होऊन तोच अर्थ साररूपाने श्रुति सांगत असते. (समाप्ता आख्यायिका । आख्यायिकानिर्वृत्तं त्वर्थमाख्याविकातोऽपसृत्य स्वेन श्रुतिरूपेणैव आचष्टेऽस्मभ्यम् । (बृ. शांक. भाष्य ३-३-२)  हा श्रीदत्तकृत अर्जुनोपदेश त्याप्रकारचा असल्याने त्याचे महत्त्व विशेष. यात भगवंताची अनुग्रहबुध्दि, साधकाची कामनिकता, नामस्मरणाचे श्रेष्ठत्व, भक्तीची ज्ञान-साधनता व तिचे ज्ञानोत्तर स्थान या विषयी सुस्पष्ट मार्गदर्शन आहे.  या ओव्यांचे नीट अर्थग्रहण व मनन केल्यानंतर श्रीस्वामींनी मंगलचरणाच्या ओव्या मग नवी जाणीव निर्माण करून देतील. ज्ञानोत्तर ईश्वरानुरक्तीचा तो आविष्कार आहे असे जाणवेल. त्यातील

तेजस्वी यदुपदेश । अविद्यांधतमसनाय।
कराया जो सामग्रीस । इच्छी खास न कदापी ।।७।।
ही ओवी "कैवल्या कनकाचिया दाना ।
न कडसी थोर साना ।"

या श्रीज्ञानेश्वर माऊलींच्या ओवीची आठवण करून देईल व ते
'उच्च नीच नसे देवा' या दत्तोपदेशातील ओवीचे भाष्य वाटेल.

वर्णवेना द्वैतपणा वाराया कृतध्नपणा ।
गुरुशिष्यत्व-लक्षणा । योजू बाणा प्रगटाया ।।६।। ही ओवी
परभक्ती ज्ञानोत्तर । जे ईश्वरानुरक्ति ।।२०२।।

या ओवीचे उपपादक टीप वाटेल. तात्पर्य, हा श्रीदत्तोपदेश व मंगलाचरण म्हणजेच

माघमाहात्म्याचा "कलशार्थ " तर श्रीस्वामींचा जीवनार्थ होय.

हे खरे असले तरी एका गोष्टीचा निर्देश जाताजाता करावासा वाटतो. ज्ञानोत्तर भक्ति सिध्दांताचा पुरस्कार श्रीस्वामीमहाराजाप्रमाणे मधुराद्वैताचार्य श्रीगुलाबराव महाराजांनी सुध्दा त्यात काल-खंडात अत्यंत उपपत्तिपूर्वक केला आहे. तथापि शांकर अद्वैत-संप्रदायात अगदी मोकळया मनाने या सिध्दांताचा स्वीकार झालेला अजून दिसत नाही. त्याला आणखी काही काळ लोटू द्यावा लागेल असे वाटते. या सिध्दांताविषयी मनात बारीकसी अढी असण्याची काही कारणे आहेत. अगदीच अभिनिवेशातुन हा विरोध असेल असे वाटते नाही. त्या सर्वाची चर्चा करण्याचे हे स्थळ नव्हे. पण एक गोष्ट स्पष्ट आहे. जिथे भक्ति विषय अधिक प्रस्तुत आहे त्या गीताभाष्यातहि आचार्य ज्ञानलक्षण भक्ति असा शब्द वापरतात. ज्ञानोत्तर-भक्ति वापरत नाहीत. ज्ञानोत्तर शब्द वापरण्याने ज्ञानाला दुय्यमपणा येऊन जातो असे अद्वैत-अभ्यासकांना वाटत राहते. या सर्व शंकाच्या निरसनासाठी पुनःएकदा संपूर्ण शांकरभाष्याचे भंग मंथन होण्याची निकड आहे. केवळ शब्दावर भिस्त ठेवून हा विषय अडू नये. नाहीतर व्याकरणतीर्ण = व्याकरण पार करून गेला याचा अर्थ व्याकरण सोडून व्याकरणरहित नव्या प्रांतात गेला असा होऊ लागेल. पण व्याकरण तीर्णः या वाक्प्रचाराचा अर्थ व्याकरणातच अधिक तळ त्याने गाठला असा जसा होतो त्याप्रमाणे ज्ञानोत्तर शब्द, ज्ञानाचे निकृष्टत्व दर्शविण्यासाठी नसून ज्ञानाचे स्थैर्य दाखविण्यासाठी आला आहे असे कां मानु नये? ज्ञानाचा जो आधार भक्ति ती ज्ञानात प्रकट झाल्यावाचून कशी राहिल. श्रीस्वामींनी दिलेली स्तंभाधाराची उपमा दृष्टीने पाहिली पाहिजे. ती दृढता दर्शविण्यासाठीच माघमाहात्म्यात चिदन्वय विश्व (१७८, ३३८) व भगवन्मूर्ति विश्व (७८) असा शब्द येतो. चिदन्वय म्हणजेच आनंदान्वय अथवा भगवदन्वय होय. भगवन्मूर्ति शब्दावरून ते स्पष्ट दिसते. पण दत्त पुराणांत श्रीस्वामींनी "आनन्दादयः प्रधानस्य " या ब्रह्मसुत्राचा शांकरभाष्याच्या आधारे दाखला देऊन स्पष्ट कंले आहे. (दत्तपुराण १-८-३० पृ. ११०) या आनन्दान्वयाचे किंवा भगवदन्वयाचे दुसरे नाव ज्ञानोत्तर-भक्ति होय. ज्ञानलक्षण शब्द असो किंवा ज्ञानोत्तर शब्द असो तिथे भक्ति शब्द जोडावासा वाटतो तेव्हा ज्ञानाधिष्ठित भक्तीची अनिवार्यता आपोआपच मान्य होऊन जाते. नाहीतर ती निरर्थक पुनरुक्ति ठरेल. श्रीस्वामींच्या समग्र वाङ्मयात व जीवनात जो भक्तीचा गहिंवर दिसून येतो लहानशी चन्द्रकोर म्हणजे माघमाहात्म्यातील ही लहानशी ओवी-परभक्ति ज्ञानोत्तर । जे ईश्वरानुरक्ति

याप्रमाणे माघ-माहात्म्याला "संचारिभावाचे" तर श्रीदत्तार्जुन-संवादाला "स्थायिभावाचे" स्थान देऊन ही साहित्य कृति श्रीस्वामींनी निर्माण केली. तिची फलश्रुति आहे -

हा श्रीदत्तार्जुन संवाद । माघमाहात्म्यमिषे विशद ।
हो हा हरी जीवात्मभेद । अखेर पद दे ध्रुव ।।३४३।।

- डॉ. श्री. नानासाहेब तथा गुणाकरजी वा. पिंपळापुरे
नागपुर

।। ॐ नमो भगवते दत्तात्रेयाय ।।

## या ग्रंथाचे मंगलाचरण

**श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः श्रीकुलदेवतायै नमः । श्रीगुरुभ्यो नमः ।**

**ॐ** कारसद्रस पाजुनी । आवृत्तिरोग निरसुनी ।
टांकिला ज्या गुरुवैद्यानीं । त्याला ध्यानी आणूं नित्य ।।१।।
**न** चले कोणाचें औषध । व्यर्थ झाले यत्न विविध ।
असाध्य तो रोगबाध । प्रणवबोधरसे केला ।।२।।
**मो** घ होता अन्योपाय । भावें धरिले म्यां पाय ।
प्रीत होवुनि गुरुमाय । सर्वापाय दूर करी ।।३।।
**भ** क्तिरसाच्या अनुपानें । ज्याणें अर्धमात्रादानें ।
ध्यानपथ्य योजुनी क्षणें । रोगभेणें दवडिलें ।।४।।
**ग** ती अतर्क्य औषधाची । एकाक्षरें या जीवाची ।
एकाक्षरता झाली साची । नवल हेंची न वर्णवे ।।५।।
**व** र्णवेना द्वैतपणा । तथापि वाराया कृतघ्नपणा ।
गुरुशिष्यत्व लक्षण । योजूं बाणा प्रगटाया ।।६।।
**ते** जस्वीनी यदुपदेश । अविद्यांधतमसनाश ।
कराया जो सामग्रीस । इच्छी खास न कदापी ।।७।।
**दत्** ताभय दत्तात्रेय । तोचि माझा गुरुराय
त्याचे नित्य चिंतू पाय । जे अपाय निवारिति ।।८।।
**ता** रक जो ह्या कलियुगी । स्मृतिगामी पावे वेगीं
यत्कृपेनें धन्य जगीं । होती रागी विरागी ।।९।।
**त्रे** धा पापतापहर । त्याणें केला जो सादर ।
कातावीर्या बोध रुचिर भाषांतर करुं त्याचें ।।१०।।
**या** भाषेची प्रौढी आज । लोकां असे प्रायः मज ।
धीप्रेरकें दिधला उमज । निजगुज समजवाया ।।११।।
**य** मादियोगसंपन्न । कार्तवीर्य तो अर्जुन ।
सह्यतटी माघी येवुन । श्रीदत्तचरण वंदितसे ।।१२।।

मालाकमण्डलू वाद्यत्रिशूले शङखचक्रके ।।४८।।
दधानमत्रिवरदं दत्तात्रेयं त्र्यधीश्वरम् ।
ध्यात्वेत्थं विधिवन्मन्त्रजाप्युक्तफलभाग्भवेत् ।।४९।।
ॐनमो भगवान्दत्तात्रेयः स्मरणमात्रसंतुष्टो ।
महाभयनिवारणो महाज्ञानप्रदः ।।५०।।
चिदानन्दात्मा बालोन्मत्तपिशाचवेषो ।
महायोग्यवधूतोऽनसूयानन्दवर्धनोऽत्रिपुत्रः ।।५१।।
ॐ बन्धविमोचनो ऱ्हीं सर्वविभूतिदः ।
क्रों असाध्याकर्षण ऐं वाक्प्रदः ।।५२।।
क्लीं जगत्त्रयवशीकरणः सौः सर्वमनःक्षोभणः ।
श्रीं महासंपत्प्रदो ग्लौं भूमण्डलाधिपत्यप्रदः ।।५३।।
द्रां चिरजीवी वषड्वशीकुरु वौषडाकर्षय ।
हुं विद्वेषय फडुच्चाटय ठः ठः ।।५४।।
स्तंम्भय खें खें मारय नमः संपन्नय ।
स्वाहा पोषय परमन्त्रपरयन्त्रपरतन्त्राणि छिन्धि ।।५५।।
ग्रहन्निवारय व्याधीन्विनाशाय ।
दुःखं हर दारिद्र्यं विद्रावय देहं पोषय ।।५६।।
चित्तं तोषय सर्वमन्त्रस्वरूपः ।
सर्वतन्त्रस्वरूपः सर्वपल्लवस्वरूपः ।।५७।।
ॐनमो, महासिध्दः स्वाहान्तो मालामन्त्रः ।
प्रथमान्तांश्चतुर्थ्या द्विः क्रियाश्च व्याहरेत् ।।५८।।
विष्णुनोक्ता इमे मन्त्रा ब्रह्मणे कामधेनवः ।
प्रयोगग्रहभूतारिकुदृग्रुक्तापभीतिहाः ।।५९।।
कामिनोऽभीष्टफलदा देवसांनिध्यकारकाः ।
तद्वच्च वज्रकवचं दत्तनामसहस्त्रकम् ।।६०।।
एषामन्यतमेनेशः यो वैदिकविधानतः ।
उपास्ते चित्तशुद्ध्या स मुच्यतेऽत्र परत्र वा ।।६१।।

स्फुटार्थ श्लोक।।४५।।४६।।४७।।४८।। *विधिवत्पु*रश्चरणपूर्वकम्।।४९।। ओमित्यादिमालन्त्रः ।।५०।। ५१।।५२।।५३।।५४।।५५।।५६।।५७।। प्रथमान्तांश्चतुर्थ्यन्तान्ब्रूयात्क्रियापदानि च द्विवारं ब्रूयात् ।।५८।। मन्त्रादि*परकृतप्रयोगः ग्रहा* भूताश्च प्रसिध्दाः *कुदृक* दृष्टिदोषः *अरिः* शत्रुः *रुक्* रोगः *ताप*स्त्रिविधः *भी*दृष्टादृष्टभयं चैपांनाशकः ।।५९।। *वज्रकवचं* रुद्रयामलोक्तम् ।।६०।।

